# याज्ञवल्क्य



लेखक

महाराष्ट्रिय.



प्रकाशक

रघुनाथ कृष्ण पाटणकर,

राजापूर ( रत्नागिरी. )



शके १८६६

# याज्ञवल्क्य.

" हिंसारहित यज्ञ व ब्राह्मणांची मांसनिवृत्ति " या प्रबंधामध्यें हिंसारहित यज्ञाचा उपक्रम फार प्राचीन कालीं झाल्याचें दाखविलें असून त्यानिमित्त शतपथांतील अवतरण दिलें आहे व त्यावरील चर्चेमध्यें शतपथाचे द्रष्टे याज्ञवल्क्य व जनमेजयाला महाभारत सांगणाऱ्या वैशंपायनाचे शिष्य याज्ञवल्क्य भिन्न असल्याविषयीं टीप देऊन वाचकांना सुचविलें आहे. शतपथाचा व भारतीय युद्धाचा काल यांमध्यें अंतर आहे व हें लक्षांत घेऊन तेथील प्रतिपादन वाचूं लागलें असतां कालक्रमामध्यें विसंगतता वाटण्याचा संभव आहे व ती वाटल्यावर कालक्रमाचा विपर्यास उत्पन्न होऊन आमचें प्रतिपादन वाचकांस पटावयाचें नाहीं, यासाठीं तशी सूचना देऊन ठेवणें भाग पडलें. मात्र लोकांमध्यें हे याज्ञवल्क्य एक असल्याविषयीं समजूत आहे. प्राचीन ऐतिहासिक चरित्र-कोशांत तसें स्पष्ट विधान आहे व याज्ञवल्क्यांचें म्हणून प्रसिद्ध झालेलें चरित्र याच भावनेनें लिहिलेलें आहे आणि यासाठीं केवळ टीपेंत सूचना दिल्यानें हें काम हातावेगळें होण्यासारखें नाहीं, याची जाणीव त्याच वेळीं आम्हांला होती; तथापि हा विषय तेथें आनुषंगिक असल्यामुळें त्यावर टीप देऊन वाचकांस सावधानतेची सूचना करण्यापलीकडे आम्हांला कांहीं करतां येण्यासारखें नव्हतें, हें उघड आहे. हा विषय येथें आनुषंगिक असला तरी स्वभावतः स्वतंत्र आहे व यासाठीं प्रस्तुत तो हातीं घेऊन त्यावर चर्चा करण्याचें योजिलें आहे.

## चरित्राची रूपरेषा.

याज्ञवल्क्य दोन मानावयाचे म्हणजे ते भिन्न कालीं झाले, असें मानावयाचें आहे आणि हें ठरविण्याला त्यांचे चरित्रांत आधार शोधावा लागणार, हें उघड आहे. तेव्हां लोकांत प्रसिद्ध असलेल्या त्यांच्या चरित्राची रूपरेषा देऊं.

जनकाच्या यज्ञामध्यें याज्ञवल्क्य व शाकल्य यांमध्यें वाद होऊन त्यांत

याज्ञवल्क्य विजयी झाल्याची व त्यांनीं जनकाला उपदेश केल्याची कथा बृहदारण्यकांत आली आहे. शांतिपर्वांत याज्ञवल्क्यांची कथा सांगितलेली असून तींत हा उपदेश दैवराति जनकाला करण्यांत आल्याचा विशेष उल्लेख आहे. कांहीं पुराणांत ही कथा आलेली असली तरी जनकाचें विशेष नांव त्यांत आलेलें नाहीं. हा याज्ञवल्क्य वैशंपायनाचा शिष्य. गुरुशिष्यांमध्यें कलह उत्पन्न होऊन त्याचें पर्यवसान गुरूनें शिष्याकडे आपली विद्या परत मागण्यांत झालें. याज्ञवल्क्यांनीं वेद परत केला व सूर्यापासून स्वतंत्रपणें मिळविला. हीच वाजसनेयी किंवा शुक्लयजुःसंहिता होय. हिच्या अपेक्षेनें दुसरीला कृष्णयजुःसंहिता असें नांव आहे. ती वैशंपायनाचे इतर तित्तिरि आदि शिष्यांकडे राहिली व म्हणून तिला तैत्तिरीय संहिता असेंहि म्हणतात. याज्ञवल्क्याला दोन स्त्रिया होत्या, त्यांपैकीं मैत्रेयीला त्यांनीं ब्रह्मविद्या सांगितली. हा उपदेश बृहदारण्यकांत आला आहे. याचे नांवानें एक स्मृति, शिक्षा, गीता असे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. जनमेजयाचा पुत्र शतानीक याचाच शिष्य म्हणून विष्णुपुराणांत उल्लेख आहे.

याज्ञवल्क्याचे चरित्राची रूपरेषा जी वर दिली आहे, तींत त्याचा काल ठरविण्याचीं साधनें दोन आहेत. जनकाचे यज्ञामध्यें त्याचा शाकल्याशीं वाद झाल्याचें सांगितलें असून शांतिपर्वामध्यें त्या जनकराजाचें नांव दैवराति असें दिलें आहे, हें एक व तो शतानीकाचा गुरु हें दुसरें. विद्यानिधि चित्रावशास्त्री याचे चरित्र-कोशांत या दोघांचा निर्देश करून दुसरें साधन ग्राह्य ठरविण्यांत आलें आहे व फार प्राचीन कालचा दैवराति जनक त्यावेळीं असणें शक्य नाहीं, म्हणून त्याचे नांवाचा निर्देश पोकळ मानण्यांत आलेला आहे.

चरित्रकोशामध्यें याज्ञवल्क्यांची संख्या सहा सांगितली आहे. त्यांपैकीं पांचांचे संबंधानें ते कोणाचे शिष्य व पुत्र हें सांगण्यापलीकडे अधिक माहिती देण्यांत आलेली नाहीं; अर्थात् ती मिळत नाहीं. आम्ही वर दिलेली माहिती एकाच याज्ञवल्क्यासंबंधानें म्हणून सांगितलेली आहे व निरनिराळ्या पुराणांतून ती संकलित करण्यांत आलेली आहे. याज्ञवल्क्य एकाहून अधिक असल्याचें कळल्या-वर एकाचे चरित्रांतील दोन कथांमध्यें कालांतर दिसल्यास व्यक्ति दोन मानणेंच

युक्त होय व वरील प्रसंगीं तसें करितां आलें असतें; तथापि दैवराति जनक फार प्राचीन व याज्ञवल्क्य त्या वेळीं असंभवनीय मानून कोशकारांनीं वरील मार्ग पत्करिला आहे. आणखीहि अशा कालविषयक शंका त्या चरित्रांत संभवतात; पण त्यांविषयीं तेथें कांहीं लिहिलेलें नाहीं आणि कोशासारख्या कामांत इतकें लक्षहि ठेवितां येण्यासारखें नाहीं.

## व्यास व याज्ञवल्क्य

शतपथानिमित्त व्यास व याज्ञवल्क्य यांचा संबंध इतका निगडित झाला आहे कीं, याज्ञवल्क्य व्यासांचे शिष्यपरंपरेंतील नसावे, हें संभवनीय वाटत नाहीं. व्यासांनीं वेदांचें संहितीकरण करून त्यांचे चार भाग केले व चार शिष्यांना पढविले. या चारांपैकीं वैशंपायन हे एक होत. त्यांचे शिष्य याज्ञवल्क्य. गुरु-शिष्यांमध्यें कलह होऊन त्यानिमित्त याज्ञवल्क्यांची वाजसनेयी ही स्वतंत्र शाखा निघाली. शतपथ हें त्या शाखेचें ब्राह्मण. व्यासांचें संहितीकरण झाल्यावांचून पुढील कार्यप्रणाली कशी संभवणार? एकंदरींत व्यासांची ही कामगिरी शोधकांना पदोपदीं अडवीत असते, तेव्हां त्यासंबंधीं प्रथम विवेचन करूं.

वास्तविक वेदांचे चार भाग व्यासांनीं केले नसून ते पूर्वींचेच होते. ऋग्वेदादि भेदांचे निर्देश वेदांमध्यें बहुत आहेत. त्या त्या वेदांचे मंत्र एकत्र करून त्यांच्या पृथक् संहिता करण्याचें काम व्यासांनीं केलें. 'केसरी'सारख्या पत्रांतून विविध विषयांवर आलेल्या लेखांचें वर्गीकरण करून ज्याप्रमाणें ऐतिहासिक, राजकीय, सामाजिक इ. विषयांवरील लेखांचे स्वतंत्र खंड काढावे, त्याप्रमाणेंच हें काम होय. म्हणजे ऐतिहासिक इत्यादि भेद पूर्वींचे असून ते व्यवस्थित व एकत्र जुळविणें एवढें काम नंतरचें समजावयाचें आहे. किंवा टिळक, केळकर, खाडिल-कर यांचे लेख निवडून ते प्रत्येकाचे नांवें एकत्र करून प्रसिद्ध करण्यासारखें हें काम आहे. संहितांमध्यें एकएका ऋषीचे नांवें पृथक् मंडल ठेवण्याची जी योजना आहे, ती अगदीं यासारखी आहे. पांडवांचे पितामह व्यास यांनीं अशी कामगिरी केली, यांत शंका नाहीं; पण सध्यां आपल्यापुढें चार वेदांच्या

ज्या संहिता उपलब्ध आहेत, त्या सर्वांचें संपादन-संहितीकरण-त्यांनीं केलें व तें त्यांचे पूर्वी झालें नव्हतें, अशी जी एकंदरींत लोकांमध्यें समजूत प्रचलित आहे, ती मात्र चुकीची आहे.

वेदांचे चार भाग स्वतंत्र असून त्यांच्या शाखा अनेक आहेत. ऋग्वेदाच्या २१, यजुर्वेदाच्या १०१ व सामवेदाच्या १००० शाखा असल्याची नोंद पातंजल महाभाष्यांत आहे. सध्यां इतक्या शाखा उपलब्ध नाहींत हें खरें; तथापि पतंजलींचे कालीं त्या होत्या, हें उघड आहे. यांपैकीं याज्ञवल्क्यांचे यजुःशाखेचे भेद १५ असल्याचें पुराणांत सांगितलें आहे. कृष्णयजुर्वेदाच्या शाखा ८५ घेतल्यानंतर संख्या वरीलप्रमाणें एकशेएक भरते. शाखांचे भेद म्हणजे पाठभेद होत. पतंजलींचे कालीं संस्कृत भाषा प्रचारांतून जात होती. वैदिक भाषा तर भारतीय युद्धाचे पूर्वीच प्रचारांतून गेली होती. अर्थात् शाखाभेद वाढण्याचें काम पुढील कालांत संभवत नाहीं. वाजसनेयी शाखा भारतीय युद्धकालीं उत्पन्न झाल्याचें वरील इतिहासावरून मानावें लागतें. याज्ञवल्क्यांचे शिष्य अनेक असले, तरी तितके शाखाभेद लागलींच होणें शक्य नाहीं. आपण शिकलेली शाखा मूळ असून ती अबाधित चालू रहावी, अशी प्रत्येकाची इच्छा असते व कालांतरानें अध्ययनाला मालिन्य येऊन पाठभेद उत्पन्न होतात. मात्र या मालिन्याची जाणीव नसल्यानें प्रत्येकाला आपला पाठ बरोबर वाटतो; आणि हेंच शाखाभेदाचें कारण होय. ही शाखा यजुर्वेदाची व त्यांत यज्ञयागांचें प्राबल्य आहे. यज्ञयाग तर भारतीय युद्धानंतर कमी होत होत पुढें जिनाचे प्रचारानें तर त्यांचा पूर्ण ऱ्हास झाला. अर्थात् शाखाभेद मधील कालांत कसे व्हावे ?

दुसरें असें कीं, वैदिक वाङ्मय शुद्ध राहण्यासाठीं प्राचीन कालीं जे प्रयत्न करण्यांत आले, त्यांपैकीं पदपाठ व क्रमपाठ हे दोन होत. हे प्रयत्न असे आहेत कीं, मंत्र म्हणतेवेळीं प्रमाद अथवा भूल होत असेल तर त्यांची जाणीव पदें वा क्रम म्हणतेवेळीं अवश्य होते व अशुद्ध पाठ रहात नाहीं. हीं कार्यें संहितिकरण झाल्यावांचून आधीं होणें संभवत नाहीं. पदच्छेद प्रत्येक मंत्रापुरता करितां येण्यासारखा असला तरी संहिता नसल्यास या कार्याची आवश्यकता उत्पन्न

होण्यासारखी नाहीं आणि त्याला पूर्णता येणार नाहीं. तेव्हां वेदांच्या संहिता झाल्यानंतर पदपाठ व क्रमपाठ यांची मांडणी संभवनीय दिसते, हें उघड आहे. पदपाठप्रवर्तक शाकल्य असून क्रमाचा प्रवर्तक **गालव×** होय. हा गालव काशीचा राजा ब्रह्मदत्त याचा मित्र असून ब्रह्मदत्ताची कथा हरिवंशांत आली आहे. भीष्माचा पितामह राजा प्रतीप हा त्याचे बरोबरीचा. अर्थात् भारतीय युद्धकालाचे मागें शंभर वर्षें त्याचा काल येईल. म्हणजे गालवाची क्रमयोजना भारतीय युद्धाचे अर्थात् व्यासाचे पूर्वी शंभर वर्षें घडून आली, हें उघड आहे. पदपाठ ही त्याचे पूर्वीची पायरी असून ती त्यापूर्वी कित्येक वर्षें चालू असली पाहिजे. कारण तिची कल्पना येऊन व चालू होऊन तिची उपयुक्तता पटल्यावर तिचे दृढतेसाठीं ही पुढील पायरीची क्रमपाठाची कल्पना उदित झाली, हें सांगावयास नको. अर्थात् या कामीं कांहीं काल जाणें अवश्य आहे. व्यासांचे पूर्वी वेदांचें संहितीकरण झालें होतें, असें येथपर्यंत अनुमानानें ठरविलें; आतां प्रत्यक्ष प्रमाण मिळत आहे, तें देतों. हरिवंशामध्यें अजमीढाचा वंश सांगतांना त्या वंशांतील राजा रुन्नति याचा पुत्र कृती म्हणून सांगितला असून त्यासंबंधानें पुढील माहिती दिली आहे—

**चतुर्विंशतिधा तेन सप्राच्याः सामसंहिताः ॥** ( १।२०।४३ )
**स्मृतास्ते प्राच्यसामानः कार्तयो नाम नामतः ॥**

---

× याज्ञवल्क्यांचे कालनिर्णयाचे कामीं सोयीचें पडावें, म्हणून गालवाचा उल्लेख येथें आम्ही केला आहे. वास्तविक गालव हा क्रमाचा आद्य प्रवर्तक नव्हे. त्याचे नांवें क्रमाची एखादी शाखा असल्याचें वरील उल्लेखावरून म्हणतां येईल. शौनकाचे प्रातिशाख्यांत क्रमाचा प्रवर्तक बाभ्रव्य म्हणून सांगितला आहे ( ११।६५ ). तथापि क्रमाविषयीं शाकल्याचा कांहीं तरी ग्रंथ असावा, असें वाटतें; कारण शौनकानें प्रातिशाख्यांत शाकल्याचीं विशेष मतें प्रसंगवशात् दर्शविलीं आहेत. यावरून शाकल्यानें प्रथम पदपाठ प्रवृत्त केला व क्रमाची कल्पना बाभ्रव्यानें पुढें ठेविली; शाकल्याचा क्रमाविषयीं प्रयत्न त्यानंतरचा असा कार्यक्रम दिसतो. अर्थात् शाकल्य व बाभ्रव्य समकालीन ठरतात.

*

येथें कृती राजानें नांवानें २४ प्राच्य सामसंहिता सांगितल्या आहेत व त्यानिमित्त त्या सामांना कार्ति असें अन्वर्थक नांव आहे. हा कृती राजा भीष्मांचा पितामह जो प्रतीप त्याचे बरोबरीचा असावा असें वाटतें. या कृतीचा पुत्र उग्रायुध, त्याचा वध भीमांनीं शंतनु मृत्यु पावल्यावर लागलींच केला. शंतनूचे मृत्यूनंतर त्याचे अशौचांत उग्रायुधानें शंतनूची स्त्री जी सत्यवती तिला मागणी घातली व त्यानिमित्त चीड येऊन भीष्मांनीं त्याशीं युद्ध केल्याची कथा आहे. अर्थात उग्रायुध शंतनूचे बरोबरीचा व त्याचा पिता कृती हा प्रतीपाचे बरोबरीचा दिसतो. प्रतीपाचा काल भारतीय युद्धापूर्वी शंभर वर्षें वर अनुमानिला आहे; म्हणजे त्या वेळीं अर्थात व्यासाचे पूर्वीं संहिता होत्या, हें निर्विवाद आहे. येथे केवळ सामसंहितेचा उल्लेख असला तरी तीवरून इतर वेदांच्या संहितांचें अस्तित्व निश्चित अनुमानितां येतें.

वेदांचें संहितीकरण एकट्या द्वैपायन व्यासांनीं आणि एकदां केलें, अशी लोकांत समजूत आहे, ती चुकीची आहे. द्वैपायन व्यासांनीं हें कार्य केलें, पण तें शेवटचें. व्यास ही हें कार्य करणाराची अन्वर्थक पदवी आहे व या कल्पनेस अनुसरून भिन्न भिन्न कालीं झालेल्या व्यासांचीं नांवें पुराणांतून दिलेलीं आहेत. मनु हा पहिला व्यास सांगितलेला आहे· अर्थात् आपापल्या कालांतील मंत्र–भागापुरती त्यांनीं कामगिरी केली, असें समजावयाचें आहे. पूर्वापर कालसूचक निर्देश वेदांत आहेत; तसेंच विविध कालांतलि व्यक्तींचे उल्लेख आहेत; तेव्हां सर्व मंत्र एका कालांतील म्हणतां येणार नाहींत, हें उघड आहे. शंतनूचा बंधु देवापि याची कथा ऋग्वेदांत आली आहे (मं० १०।९८) व अशा मंत्रांचा पूर्वसंपादित संहितांतून व्यवस्थित समावेश करण्याचें काम द्वैपायनांनीं केलें, असें म्हणतां येईल. त्यांना मिळालेल्या व्यास पदवीची संगति लावण्याचा हाच मार्ग युक्त दिसतो.

वेदांचें संहितीकरण भारतीय युद्धाचे पूर्वी फार प्राचीन कालीं झाल्याचें वरील विवेचनावरून सिद्ध होत आहे व हें लक्षांत घेतलें म्हणजे याज्ञवल्क्यांचे कथेंतील ते व्यासांचे शिष्याचे शिष्य असल्याची कल्पना ग्राह्य मानली तरी

कालक्रमविपर्यासाची शंका घेण्याचें प्रयोजन नाहीं. कारण भारतीय युद्धापूर्वी ज्या कोणी व्यासांनीं वेदांचें संहितीकरण केलें, त्यांपैकीं कोणाचे तरी ते शिष्य असावे, असें मानतां येईल.

याज्ञवल्क्यांचें चरित्र शांतिपर्वात भीष्म-युधिष्ठिर-संवादांत आलें आहे आणि हा सर्व कथाभाग वैशंपायनांनीं जनमेजयास सांगितलेला आहे. या संवादाचा उपक्रम भीष्मांनीं—

"अत्र ते वर्तयिष्यामि इतिहासं पुरातनम्" ॥३१५।३

असा केला आहे. येथें ही कथा फार प्राचीन कालची म्हणून भीष्म सांगत आहेत. या संवादांतील सर्व कथांचा उपक्रम अशा प्रकारें केलेला आहे व कथाहि प्राचीन आहेत. तथापि हें सर्व विवेकपूर्वक केलें आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण शुकजन्म व शुकजनक-संवादाची कथा या पर्वात आली आहे, तिचा उपक्रम वरीलप्रमाणें केलेला नाहीं. तेथें—

" अत्र ते वर्तयिष्यामि जन्मयोगक्रमं तथा ॥ ३३१।१०

असा उपक्रम केला असून त्याची समाप्ति—

"इतिहासमिमं पुण्यं मोक्षधमार्थसंज्ञितम् ॥ ३४१।१२

अशी केली आहे.

दुसरें असें कीं, भीष्म व व्यास हे बरोबरीचे; अर्थात् वैशंपायन व युधिष्ठिरादि बरोबरीचे असणार; म्हणजे वैशंपायन-शिष्य याज्ञवल्क्य व अभिमन्यु हे बरोबरीचे असावयाचे. या सर्वांची समवयस्कता आम्ही स्थूल मानानें धरलेली आहे, हें सांगावयास नको. भारतीय युद्धाचे वेळीं युधिष्ठिरादि मंडळी वृद्ध झालेली नव्हती. युद्धसमाप्तीनंतर युधिष्ठिरानें ३६ वर्षे राज्य केलें. तेव्हां भारतीय युद्धकालीं याज्ञवल्क्यांनीं वैशंपायनापाशी अध्ययन केल्यावर गुरूशीं कलह होऊन सूर्यापासून स्वतंत्रपणें विद्या संपादन करावी, नवीन ब्राम्हणाची रचना करावी व या सर्व चरित्राला भारतीय युद्धकालींच इतिहासाचें स्वरूप यावें, इतका अवसर, मध्यंतर सांपडण्याचा संभव तरी दिसतो काय ? वैशंपायनांनीं विद्या संपादन केल्यावर याज्ञवल्क्याला शिष्य करीपर्यंत व त्यांनीं विद्या संपादन केल्यावर गुरूशीं कलह

होईपर्यंत मध्यंतरीं कांहीं काल जाणें अवश्य आहे. कारण त्यांचीं चरित्रें बोलपटां-तील घडामोडींप्रमाणें क्रमानें व त्वरेनें घडून आलीं असें म्हणतां येणार नाहीं.

जनमेजयाला महाभारत सांगणाऱ्या वैशंपायनाचे तोंडीं या सर्व कथा आलेल्या आहेत. याज्ञवल्क्य हे या वैशंपायनाचे शिष्य असतील, तर त्यांमध्यें कलह होऊन विद्या परत करण्यापर्यंत तो विकोपास गेल्यावर त्यांनीं या कथा भीष्मयुधिष्ठिर-संवादाचा अनुवाद म्हणून कां होईना–पण सांगाव्या व त्यांतून याज्ञवल्क्यां-विषयीं जागोजाग आदर व्यक्त करावा, हें मनुष्यस्वभावास सोडून आहे. निरुक्ता-वरील टीकाकार दुर्ग ग्रंथामध्यें क्रमप्राप्त आलेली ऋचा वसिष्ठद्वेषिणी व आपण वसिष्ठगोत्री म्हणून त्याची व्याख्या करीत नाहीं; म्हणजे तोहि मनुष्यस्वभावाचें हें बंधन समग्र ग्रंथावर टीका करण्यास बसला असतां पाळतो. मग वैशंपायनाचे बाबींत असंभाव्य कसें म्हणतां येईल ?

## याज्ञवल्क्य व जनमेजय.

जनमेजय राजानें अश्वमेध केला, त्या वेळीं याज्ञवल्क्य व वैशंपायन यांमध्यें कलह झाल्याची एक कथा पुराणांत आलेली आहे. अशा रीतीनें या कथेमध्यें तिघांचा संबंध निगडित झाला असल्यामुळें ते समकालीन असले पाहिजेत, असें वाटतें. पण ही कथा सांगतांना पुराणांतून कसा गोंधळ व विसंगति झाली आहे, तें आतां दाखवूं. या कलहाची कथा मत्स्यपुराणांत आली आहे. जनमेजयानें अश्वमेध केला तेव्हां वाजसनेयी ब्राह्मण बोलावून त्याला ब्रह्मा केलें व त्याला पाहून वैशंपायनास क्रोध आला व त्याला त्यांनीं–

**न स्थास्यतीति दुर्बुद्धे तवैतद्वचनं भुवि ।**
**यावत् स्थास्यसि त्वं लोके तावदेव प्रपत्स्यसि** ॥ ( ५०।५९ )

याप्रमाणें शाप दिला. येथें या वाजसनेयी ब्राह्मणाचें नांव दिलेलें नसून फक्त शाखेचा निर्देश ( वाजसनेयकम् ५०।५७ ) आहे. तथापि वैशंपायनाचे वरील शापवचनांतील "तुझी शाखा तूं जिवंत असेपर्यंत राहील, " अशा प्रकारच्या निर्देशावरून तेथें याज्ञवल्क्य अभिप्रेत दिसतात. याज्ञवल्क्याचा अनुयायीहि कदाचित् तो ब्राह्मण असूं शकेल; तथापि कोणीहि असला तरी कथेवरून हा

कलह ज्यांमध्यें झाला, त्यांपैकीं व्यक्ति वैशंपायन आहे व ती वाजसनेयी शाखा व तिचे संपादक याज्ञवल्क्य यांना आपले प्रतिपक्षी समजते, हें निर्विवाद आहे; व यावरून ते समकालीन असल्याचा जो बोध होतो, त्याविषयीं आपणास विचार करावयाचा आहे.

कलहाचें निरूपण केल्यावरून या राजानें दोन वेळां अश्वमेध केल्याचें (द्विरश्वमेधमाहृत्य ५०।६३ ) सांगून दोनही प्रसंगीं वाजसनेयी ब्राह्मणांकडून त्यानें यज्ञ करविल्यामुळें ब्राह्मणांशीं वाद होऊन त्यांनीं त्याला शाप दिले व तो अरण्यांत गेला, अशी या कथेची समाप्ति करण्यांत आलेली आहे. राजानें दोन अश्वमेध केले; अर्थात् कलह प्रथमचे यज्ञांत झाला. कलहानिमित्त वैशंपायनाचा शाप वाजसनेयी याज्ञवल्क्याला आहे. राजाला शाप मिळालेला नाहीं. दुसऱ्या वेळींहि त्यानें यज्ञार्थ वाजसनेयी ब्राह्मण बोलावले, हें उघड दिसतें. पण त्या वेळीं कलह कोणाशीं झाला ? वैशंपायनाला दुसऱ्या अश्वमेधार्थ राजानें बोलावणें आणि बोलविलें तरी त्यांनीं येणें दोनहि संभवनीय नाहींत. वाजसनेयी ब्राह्मण राजानें बोलाविलेले व ते तर राजाला इष्ट; मग ब्राह्मणांनीं शाप दिल्यामुळें राजा वनांत गेल्याचें कथेंत जें वर्णन आहे, ते ब्राह्मण कोणते समजावयाचे ? तसेंच ज्या वैशंपायनांनीं याज्ञवल्क्यांची कथा गौरवपूर्वक जनमेजयाला सांगितली, त्यांनींच याज्ञवल्क्याचे शाखेचा ब्राह्मण त्या राजाचे यज्ञांत पाहिल्याबरोबर क्रुद्ध होऊन त्यास शाप देण्यास सिद्ध व्हावें, हें कितपत सुसंगत समजावें ?

वास्तविक पौरव वंशामध्यें जनमेजय राजे दोन होऊन गेले; दोनहि परीक्षिताचे पुत्र; आणि पुराणांनीं त्यांची गल्लत केल्यामुळें हे घोटाळे झाले आहेत. हरिवंशामध्यें वंशावलि सांगतांना पौरव वंशांत दोन जनमेजय झाल्याची नोंद आहे (१।१२।१०५) म्हणजे त्याची जाणीव पुराणांना दिसते; पण कथा सांगतेवेळीं त्यांचा विवेक तीं करीत नाहींत. आधुनिक शोधकांनीं हा विवेक करण्याचा प्रयत्न केला आहे, पण त्यांत मतैक्य नाहीं. कै० रा० ब० वैद्य व रा० रा० तात्यासाहेब करंदीकर यांनीं वरील अश्वमेध दुसऱ्या जनमेजयाचा ठरविला आहे; तर चरित्रकोशकार तो प्रथम जनमेजयाचा मानितात. लो० टिळकांनीं हेंच प्रति-

पादिलें आहे. अश्वमेध करणाऱ्या राजांमध्यें जनमेजयाचें नांव शतपथ व ऐतरेय या दोन ब्राह्मणांमध्यें आलें आहे. तेथें तो जनमेजय कोणता, हें मात्र सांगितलेलें नाहीं.

या कोड्याचा उलगडा एका गोष्टीनें सहज होण्यासारखा आहे. ती गोष्ट ही कीं, जनमेजयाचे अश्वमेधाची कथा शांतिपर्वांत भीष्मांनीं युधिष्ठिराला प्राचीन म्हणून सांगितलेली आहे व तीच पुढें वैशंपायनांनीं जनमेजयाला सांगितली आहे. अर्थात् अश्वमेध प्रथम जनमेजयाचा हें उघड आहे. अश्वमेधाची ही कथा हरिवंशांत आली असून तीहि वैशंपायन-जनमेजय-संवादांत आहे. मौज ही कीं, तेथें जनमेजयाची कथा जनमेजयापुढें सांगावयाची असल्यामुळें वैशंपायनालाच शंका येऊन पौरव वंशांत दोन जनमेजय झाल्याचें तेथें त्यांनीं सांगितलें आहे. म्हणजे तेथें ही शंका व्यक्त लिहिलेली नसली तरी तिचें उत्तर व्यक्त केलें आहे व त्यावरून तेथें शंका संभवनीय वाटून ती ध्वनित केल्याचें उघड होत आहे.

जनमेजयानें अश्वमेध करून ब्रह्महत्या घालविली, असें शतपथांत सांगितलें आहे. ही ब्रह्महत्या कोणती? याचा उलगडा तेथें केलेला नाहीं. अर्जुनानें द्रोणवध करून जी ब्रह्महत्या केली, तिचा दोष परंपरेनें जनमेजयापर्यंत आला, असा येथें कोणी तर्क करितात. पण तें चुकीचें आहे. युद्धांतील हत्या दोषावह कधींच मानिली जात नाहीं. शांतिपर्वांतील कथेंत त्या राजाला ब्रह्महत्येचा दोष नकळत प्राप्त झाल्याचें ( अबुद्धिजा ब्रह्महत्या १४९१३ ) लिहिलें आहे. हरिवंशांत त्यानें गार्ग्य ऋषीच्या पुत्राला दुरुत्तर केल्यानिमित्त मारल्याचें सांगितलें आहे. या ब्रह्महत्येनिमित्त त्याचें अंगाला ( लोहगंधी। ह० वं० ११३०।११ ) लोखंडासारखी घाण येऊं लागली व त्यामुळें त्याला राज्यत्याग करावा लागल्याचें वर्णन आहे. त्यानंतर त्यानें इंद्रोतशौनकाचें सहाय्यानें अश्वमेध केला व अशा रीतीनें पापमुक्त झाल्यावर त्याला राज्यप्राप्ति झाल्याचें सांगून कथेची समाप्ति उभयत्र सारखी केलेली आहे. हरिवंशांतील कथेंत विशेष हें कीं, तेथें या कथेबरोबर ययातीला मिळालेल्या रथाचा इतिहास दिला आहे. हा रथ ययातीला इंद्रानें दिला होता व तो या जनमेजयापर्यंत त्याचे वंशजांकडे होता. जनमेजयाला गार्ग्याचा शाप

झाल्यावर तो राज्यभ्रष्ट झाला व तो रथ इंद्रानें चेदिपति वसूला दिला. वसूपुढें बार्हद्रथ–वंश चालू झाला व त्यांजकडे तो जरासंधापर्यंत होता. जरासंधाचा वध केल्यावर भीष्मानें तो श्रीकृष्णांला दिला. रथाचे या इतिहासावरून वरील जनमेजयाची कथा प्रथम जनमेजयाची असल्याचें निर्विवाद ठरतें.

हरिवंशामध्यें दुसऱ्या जनमेजयाचे अश्वमेधाची जी कथा आलेली आहे ती पाहिली तर वरील शंका उद्भवण्याचें कारण दिसत नाहीं. त्या यज्ञांत इंद्रानें अत्याचार केला व त्यामुळें इंद्र व ऋत्विज या दोहोंवर जनमेजय क्रुद्ध झाला. अश्वमेध करून इंद्राला यापुढें कोणी हविर्दान करूं नये, असा राजानें शाप दिला व सर्व ऋत्विजांना आपल्या राज्यांतून हद्दपार केलें. एकंदरींत दुसऱ्या जनमेजयाचा अश्वमेध तडीस गेला नाहीं. अर्थात् त्याला अभिषेक होण्याचा संभव नाहीं. शतपथांत इंद्रोत–शौनकाचें सहाय्यानें जनमेजयानें अश्वमेध करून ब्रह्महत्या नष्ट केल्याचें जें वर्णन आहे, त्यावरून कोणा तरी प्रक्षेपकानें ही कथा हरिवंशांत नवी रचून घातल्याची रा० ब० वैद्य यांची कल्पना आहे; पण त्याला कांहीं आधार नाहीं. उलट सबंध महाभारतांत त्यानें अश्वमेध केल्याचें कोठें लिहिलेलें नाहीं. अर्थात् ब्राह्मणग्रंथ व पुराणें यांतून जनमेजयानें अश्वमेध केल्याचें जें वर्णन आहे, तें प्रथम जनमेजयाविषयीं होय. या राजानें अश्वमेध दोन वेळां केल्याचें पुराणांत सांगितलें आहे व शतपथांत त्याचा उपाध्याय इंद्रोत-शौनक आणि ऐतरेयांत तुर कावषेय सांगितला आहे. ते दोन अश्वमेधांतील दोन उपाध्याय मानून संगति लावतां येण्यासारखी आहे.

शतपथांतील उल्लेखावरून जनमेजयाचा उपाध्याय इंद्रोत शौनक वाजसनेयी शाखेचा असावा असें दिसतें व पुराणांतील वर्णनांत त्याचें नांव न देतां शाखा स्पष्टपणें लिहिली आहे. अर्थात् त्या वेळीं म्हणजे प्रथमचे जनमेजयाचे कालीं वाजसनेयी शाखा होती व म्हणून तिचे प्रणेते याज्ञवल्क्य त्यापूर्वी होऊन गेले असले पाहिजेत, हें निर्विवाद आहे. लेखकाला कालक्रमाचें ज्ञान न झाल्यानें त्यानें दोन जनमेजयांची गल्लत करून कथा लिहिली आहे; हें खरें असलें तरी अश्वमेध प्रथम जनमेजयाचा हें निश्चित झाल्यावर इतर आनुषंगिक गोष्टी त्याच राजाचे संबंधीं गोळा करून दिल्या आहेत, असें मानणें क्रमप्राप्त आहे. तेथील वैशंपायनाचा

निर्देश उगाच आहे व तो कलह संभवनीय नसल्याचें वर दाखविलेंच आहे.

## तुर कावषेय व जनमेजय.

तुर कावषेय यानें जनमेजयाला राज्याभिषेक केल्याचें ऐतरेय-ब्राह्मणांत सांगितलें आहे. तुर हें त्या ऋषींचें नांव व कावषेय हें पैतृक नांव होय. उत्तर-पंचालाधिपति सुदास याचें दहा राजांशीं युद्ध झालें, तें ऋग्वेदांत दाशराज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. या युद्धांत सुदासाला जय मिळाला. सुदासाचे प्रतिपक्षामध्यें कवष म्हणून एक ऋषि असून त्याला बुडविण्यांत आल्याची कथा आहे. ( ऋ. ७।१८।१२ ). ऐतरेय ब्राह्मणांत ( २।३।१९ ) कवष ऐलूषाची कथा आहे. तो बहुतेक हाच असावा. ऋग्वेदाचे दहावे मंडलांतील एक सूक्त कवषाचे नांवानें असून त्यांत त्रसद्दस्युवंशीय राजाची स्तुति आहे. कावषेय या नांवावरून तुर हा कवषाचा नातू वा पणतू असावा असें दिसतें. सुदास राजाचे प्रतिपक्षी राजांमध्यें पुरु राजाचें मोघम नांव आहे. अर्थात् तो पुरु वंशीय कोणीतरी राजा होय. आदिपर्वांत पंचालाधिपतीनें संवरण नामक पौरव राजाशीं युद्ध करून त्याचें राज्य घेतल्याची कथा ( १०१।२२।१५ ) आहे. नंतर त्यानें वसिष्ठाला गुरु करून त्याचे सहाय्यानें राज्य परत मिळविल्याचें पुढें सांगितलें आहे. सुदास हा दिवोदासाचे वंशांतील पुरुष असल्याचे ऋ.७।१८।२५ वरून दिसतें. दिवोदास हा उत्तरपंचाला-धिपति म्हणून महाभारतांत सांगितलें आहे. दिवोदासापासून सुदास हा चवथा वा पांचवा पुरुष होय. सुदासाला विजय मिळाल्यावर तो दुराचारी निघाल्यामुळें त्याचें राज्यास उतरती कळा लागली व त्याचें राज्य संवरणानें त्याला जिंकून परत घेतलें. संवरणाचा पुत्र कुरु. कुरूचे पुत्र तीन– १ परीक्षित्, २ जन्हु व ३ सुधन्वा. चर्चाविषयक जनमेजय हा परीक्षिताचा पुत्र. म्हणजे संवरणापासून तो चौथा. संवरणाचा कवष हा समकालीन होय. हें दाशराज्ञयुद्धांत तो बुडाल्याचें वर सांगितलें आहे, त्यावरून सिद्ध झालें आहे. कवषाचा तुर हा नातू असावा. म्हणजे जनमेजयाहून वयानें मोठा पण समकालीन. अर्थात् तुर यानें त्याला राज्याभिषेक केला, हें सुसंगत होय. कवष हा संवरणाचे पक्षाचा व म्हणून त्याचा नातू तूर याचें संवरणाचा पणतू जनमेजय याशीं सख्य असावें, हें क्रमप्राप्त आहे.

वर सांगितलेला उत्तरपंचालाधिपति दिवोदास हा वध्र्यश्वाचा पुत्र. याची

बहीण अहल्या ही गौतमाची पत्नी व शतानंदाची माता. या अहल्येचा उद्धार रामांनीं केल्याची प्रसिद्ध कथा रामायणांत आहे. अहल्या रामापेक्षां वयानें मोठी. अर्थात् दिवोदास स्थूल मानानें दशरथाचे बरोबरीचा असें म्हणतां येईल. दाशराज्ञयुद्धांतील सुदास हा दिवोदासापासून चवथा का पांचवा पुरुष. अर्थात् रामानंतर शंभर वर्षांचे आंतच दाशराज्ञयुद्धाचा काल येतो. जनमेजयाचा राज्याभिषेक त्यानंतर पन्नास पंचावन वर्षांनीं झाला असेल.

जनमेजय व तुर यांतील आनुवंशिक स्नेहावरून त्याचा पहिला अश्वमेध तुर यानें केला असला पाहिजे. दुसरा अश्वमेध त्यानें दोषमुक्तीसाठीं केला व त्याची कल्पना त्याला इंद्रोत-शौनकानें सुचविली अर्थात् त्यांतील पौरोहित्य त्यानें करणें साहजिक आहे. त्या वेळीं राजा गादीवर नसून अरण्यांत भटकत होता व त्या वेळच्या त्याच्या स्थितीचें जें वर्णन पुराणांत आहे, त्यावरून त्याला त्या वेळीं रक्तपितीसारखा विकार होऊन त्याला राज्यावरून प्रजेनें दूर केलें असावें, असें वाटतें व जनमेजयाचे राज्यभ्रंशामुळें त्याची गादी सुधन्व्याचा पुत्र सुरथ याला मिळाली.

अशा रीतीनें जनमेजयाचा काल **रामानंतर एकशें पन्नास वर्षांनीं येतो** व त्या वेळीं त्यानें केलेल्या यज्ञांत वाजसनेयी शाखेचा ब्राह्मण ब्रह्मा होता. अर्थात् शाखेचे प्रवर्तक याज्ञवल्क्य त्याचे फार मागें जातील, हें उघड आहे.

प्रस्तुतचा तुर कावषेय हा दुसऱ्या जनमेजयाचा पुरोहित असल्याचें प्रो० आळतेकर यांनीं कलकत्ता येथील इतिहास परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत सांगितलें आहे. येथें त्यांनीं ऐ० ब्रा०मधील अवतरण दिलें आहे व त्यांत त्यानें अश्वमेध केल्याचें लिहिलें आहे. हा जनमेजय कोणता, हें तेथें लिहिलेलें नाहीं व तो पांडवांचा नातू म्हणण्यासारखें तेथें प्रमाण नाहीं. दुसऱ्या जनमेजयानें अश्वमेध केल्याचा इतिहास मिळत नसल्याचें वर दाखविलें आहे. तेव्हां तो अश्वमेध दुसऱ्या जनमेजयाचा, म्हणून त्यावरून त्याला अभिषेक करणारा तुर कावषेय याचा व बृहदारण्यकाचा त्यांनीं जो काल ठरविला आहे, तो मान्य करतां येणार नाहीं.

शांतिपर्वामध्यें युधिष्ठिरानें विचारल्यावरून भीष्मांनीं पुरोहित कसा असावा, याविषयीं विवेचन केलें आहे. या विवेचनांत भीष्मांनीं बृहस्पतीचीं वचनें म्हणून

कांहीं श्लोक सांगितले आहेत—

> श्लोकानाह महेंद्रस्य गुरुर्देवो बृहस्पतिः ॥१६॥
> तान्निबोध महीपाल महाभाग हितान् शुभान् ॥
> ऋग्वेदे सामवेदे च यजुर्वेदे च वाजिनाम् ॥१७॥
> न निर्दिष्टानि कर्माणि त्रिषु स्थानेषु भूभृताम् ।
> शान्तिकं पौष्टिकं चैव अरिष्टानां च शातनाम् ॥१८॥
> शमास्ते याज्ञवल्क्येन यज्ञानां हितमीहता ।
> ब्रह्मिष्ठानां वरिष्ठेन ब्रह्मणः संमते विभोः ॥१९॥
> बह्वृचं सामगं चैव वाजिनं च विवर्जयेत् ।
> बह्वृचो राष्ट्रनाशाय राज्यनाशाय सामगः ॥
> अध्वर्युर्बलनाशाय प्रोक्तो वाजसनेयकः ॥२०॥ ( शांति० ७३ )

श्लोकांतील शब्दांपुरते निर्देश करून त्यांचें महत्त्व लक्षांत येण्यासारखें नाहीं; यासाठीं सर्व श्लोक अवतरले आहेत. यांत अथर्ववेत्ता ब्राह्मण अध्वर्यु करावा, असें सांगून इतर वेदवेत्त्यांचे योगानें हानि होते, असें सांगतांना वाजसनेयी शाखेचा स्पष्ट निर्देश केला आहे; आणि हा दंडक याज्ञवल्क्यांनीं घातला, असें म्हटलें आहे. येथील याज्ञवल्क्यांचा निर्देश ब्रह्मिष्ठांमध्यें वरिष्ठ असा गौरवपूर्ण केला आहे. अर्थात् हे याज्ञवल्क्य ब्रह्मवेत्ते होत, हें उघड आहे. वाजसनेयी ब्राह्मणांचे निषेधांत त्यांची निःस्पृहताहि दिसते. हे श्लोक बृहस्पतींचे म्हणून भीष्मांनीं सांगितले असून शेवटचा श्लोक याज्ञवल्क्यांचा त्यांत अंतर्भूत आहे. अशीं वचनें प्रायः परंपराप्राप्त असतात. अर्थात् तीं प्राचीन होत यांत शंका नाहीं. याच अध्यायांत ( ७३ वा श्लो० ) चरकाध्वर्यूंचा निर्देश आहे. वैशंपायनाचे जे इतर शिष्य ते चरकाध्वर्यु म्हणून प्रसिद्ध आहेत. म्हणजे या सर्व शाखा व त्यांच्या संहिता प्राचीन होत यांत शंका नाहीं.

राजाचा पुरोहित अथर्ववेदी असावा, अशी प्रथा प्राचीन कालापासून असावी, असें वसिष्ठ ऋषींचा एके स्थलीं अथर्वनिधि म्हणून गौरव केला आहे, त्यावरून दिसतें ( बृहन्नारदीय ८।६३ ). हे वसिष्ठ सगराचे पुरोहित म्हणून सांगितले आहेत. अथर्वसंहिता स्वतंत्र असल्यावांचून तिचें अध्ययन– तींत प्राविण्य-

संपादितां येणार नाहीं. म्हणजे संहितीकरण सगराचे पूर्वी झालें यांत शंका नाहीं.

## ' शतपथ-ब्राह्मणा ' चा काल.

याज्ञवल्क्यांचा ग्रंथ जो ' शतपथ-ब्राह्मण ' त्याचे कालाविषयीं आतां विचार करूं. या ग्रंथाचा काल ठरविण्याचा प्रयत्न कै० दीक्षित यांनीं प्रथम केला. अग्नीचें आधान करण्याचा काल सांगण्यानिमित्त त्यांत पुढील वाक्यें आहेत—

**कृत्तिकास्वादधीत । एता ह वै प्राच्यै दिशो न च्यवंते,**
**सर्वाणि ह वा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवंते ।**

"कृत्तिका नक्षत्रावर अग्नीचें आधान करावें. त्या पूर्व दिशेपासून चळत नाहींत. इतर सर्व नक्षत्रें ( पूर्वेपासून ) चळतात."

कृत्तिका नक्षत्रावर अग्न्याधान करण्यास सांगतांना त्यांना महत्त्व कां द्यावयाचें, हें वरील वाक्यांत निरूपिलें आहे. हें कारण कोणतें ? तर त्या पूर्व दिशेपासून चळत नाहींत व इतर चळतात, हें होय. येथील क्रियापद वर्तमानकालीं आहे. सध्यां तर त्या उत्तरेस उगवतात. तेव्हां त्या ज्या काळीं पूर्वेला उगवत असत, त्या कालाचें सूचक हें वाक्य आहे, हें उघड आहे. त्या पूर्वेला उगवावयाच्या म्हणजे त्यांची क्रांति शून्य असली पाहिजे. तेव्हां कृत्तिकेंतील योगतारकेची क्रांति शून्य असण्याचा काल कै. दीक्षित यांनीं गणितानें काढला. अयनगति वर्षास पन्नास विकला धरिली तर तो त्यापूर्वी आणखी १५० वर्षें जाईल. तेव्हां स्थूल मानानें हा काल त्यांनीं शकपूर्व ३१०० वर्षें इतका निश्चित केला. अर्थात् वरील वचनें ज्या ग्रंथांत आहेत, त्यांचा काल याचेनंतर लौकरचा म्हणजे स्थूल मानानें शकपूर्व ३००० हा होय. दीक्षित यांनीं हा आपला शोध आपल्या मराठी ग्रंथांत ( भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास ) प्रकाशित करून तो पुनः इंग्रजींतून ' इंडियन अँटिक्वेरी ' या मासिकांत प्रकाशित केला व अशा रीतीनें तो सर्व जगांतील विद्वान् चिकित्सकांपुढें मांडला. त्याचें खंडन अद्यापि कोणी केलें नाहीं, हा या शोधांतलि विशेष होय.

वेदांमध्यें नक्षत्रांचा क्रम सांगतेवेळीं प्रथम कृत्तिकांचा निर्देश आहे. नक्षत्रांचें चक्र आकाशांत वर्तुलाकार आहे, तेव्हां त्यांमध्यें आरंभ कोठून करावा, हा प्रश्न केव्हांहि विचाराचा आहे. तेव्हां कोणत्या तरी नक्षत्रावर आरंभ करावयाचा

म्हणजे ती योजना सकारण करावी लागते. सूर्य विषुववृत्तावर आला म्हणजे वर्षारंभ करण्याची योजना याच दृष्टीनें व सोयीची म्हणून करण्यांत आली. सूर्य विषुववृत्तावर यावयाचा म्हणजे तो वसंत किंवा शरत् संपात होय. तेव्हां नक्षत्रांचा आरंभ कृत्तिकांपासून होऊं लागण्याचें कारण त्या नक्षत्रावर वसंतसंपात होऊं लागणें हेंच असलें पाहिजे व याच दृष्टीनें कृत्तिकांवर वसंतसंपात असण्याचा काल इ. स. पूर्वी २३२० वर्षे येतो व तोच कृत्तिकादिगणनेचा काल होय असा शोधकांनीं तर्क केला. बेंटलेप्रभृति कित्येक पाश्चात्य ज्योतिर्विदांनीं हा काल इ. स. पूर्वी पंधरावें शतक ठरविला; पण त्यांतील चूक दीक्षित यांनीं दाखवून वरील काल निश्चित केला. ऋतूंचें मुख वसंत असल्याविषयीं वेदांत पुष्कळ उल्लेख आहेत व त्यावरून वसंत हा प्रथम ऋतु मानीत असल्याचें अनुमान होतें व अद्यापि तें प्रचलित असल्यामुळें त्याविषयीं शंका रहात नाहीं. वसंत हा प्रथम ऋतु; तेव्हां त्याचा प्रारंभ ज्या नक्षत्रावर सूर्य आला असतां व्हावयाचा त्याला नक्षत्रांमध्यें प्राथम्य प्राप्त होणें साहजिक दिसतें व कृत्तिकादिगणनेचा काल निश्चित ठरल्यावर शतपथांतील कृत्तिकाविषयक उल्लेख याच दृष्टीनें करण्यांत आला असावा असा तर्क होतो व शतपथाचे वरील कालाविषयीं संशय उत्पन्न होतो. रा० तात्यासाहेब करंदीकरांनीं अशी शंका घेतली व ती आम्हांलाहि सयुक्तिक वाटली. यामुळें रामायण-कालाविषयीं विचार करितांना तिचा उल्लेख आम्हीं केला. मात्र त्या वेळीं तो प्रश्न प्रस्तुत नसल्यामुळें आम्हीं सोडून दिला, तथापि आतां त्याचा विचार करणें भाग आहे. कृत्तिकादिगणना त्या नक्षत्रावर वसंतसंपात असतां चालू झाली असावी, हें तर्कशुद्ध भासलें तरी त्यांत दुसरी अडचण आहे. ती अडचण अशी कीं, संपातबिंदु चल असून तो थोडथोडा मागें येतो; त्याप्रमाणें कृत्तिकांपूर्वी सुमारें दोन हजार वर्षे तो मृगांवर होतो; तेव्हां वसंतसंपातानुरूप नक्षत्रगणना बदलत जावयाची तर ती त्यापूर्वी मृगादि असली पाहिजे; परंतु त्याविषयीं ऐतिहासिक प्रमाण मिळत नाहीं. तेव्हां कृत्तिकादिगणनेचा वसंतसंपाताशीं कांहींएक संबंध मानण्याचें कारण नाहीं, हें उघड आहे. हा संबंध सुटला म्हणजे शतपथांतील कृत्तिकाविषयक वचनांवरून जो काल सूचित होतो, तोच तेथें घ्यावयाचा आहे. दुसरें असें कीं, कृत्तिकांवर वसंतसंपात असाव-

याचा म्हणजे कृत्तिका व सूर्य दोनहि विषुववृत्तावर असावयाचे. कृत्तिकांचें पूर्वेस उगवणें शतपथामध्यें विवक्षित आहे. तें वसंतसंपातकालीं जमण्यासारखें नाहीं. कृत्तिकांतील योगतारकेची क्रांति शून्य असेल तेव्हां हा योग साधतो. कृत्तिकावर वसंतसंपात आल्यावेळीं कृत्तिका पूर्वेला असून उत्तरेकडे चालल्या होत्या. शतपथांत तर त्या पूर्वेस उगवत असल्याचें सांगितलें असून इतर नक्षत्रें पूर्वेपासून चळतात, असें वर्णन केलें आहे. तेव्हां शतपथांतील या वचनावरून श० पू० ३१०० हा तेथील विवक्षित काल व त्यावरून शतपथाचा काल श० पू० ३००० हा सूचित होतो, यांत शंका नाहीं.

कृत्तिकानक्षत्रीं वसंतसंपात असल्याविषयींचें अनुमान तैत्तिरीयसंहिता व तैत्तिरीय ब्राह्मण, यांतीय कित्येक वचनांवरून करतां येतें. तसेंच संवत्सरसत्राला प्रारंभ करण्याचा काल सांगण्याचे निमित्तानें तै० संहितेमध्यें **जो अनुवाक आहे**, त्यावरून त्या कालीं **माघी पौर्णिमेला उदगयनारंभ होत असे**, असें दिसतें. याविषयीं विस्तृत विवेचन कै. लो. टिळक यांच्या मृगशीर्षावरील ग्रंथांत आलें आहे ( प्रकरण ३ पहा ). तै० संहितेंतील ज्या अनुवाकाचा वर उल्लेख केला आहे, त्यांत संवत्सर-समारंभाचे काल सांगतांना दोन प्राचीन वर्षारंभांचे उल्लेख आले आहेत. हे दोन वर्षारंभकाल म्हणजे फाल्गुनी १५ व चैत्री १५ हे होत. माघी १५ चा वर्षारंभ कृत्तिकानक्षत्रीं वसंतसंपात असतां व्हावयाचा म्हणजे त्यापूर्वीचा फाल्गुनी १५ चा वर्षारंभ मृगावर वसंतसंपात असतां व्हावयाचा, हें उघड आहे. हे काल गणितानें काढून पाहतां कृत्तिकाकाल इ. पू. २५०० ते १४०० पर्यंत व मृगशीर्षकाल इ. पू. ४००० ते २५०० पर्यंत याप्रमाणें निश्चित होतात. शतपथाचा काल ठरवितांना कृत्तिकाविषयक निर्देशावरून येणारी शंका एका दृष्टीनें आपण सोडविली आहे; तथापि त्या कामीं येथें आणखी प्रमाण मिळतें काय पाहूं. कृत्तिका पूर्वेला उगवण्याचा काल इ. पू. ३००० व त्यांवर वसंतसंपात येण्याचा काल म्हणजे इ. पू. २४०० वर्षें हा होय. म्हणजे हा ग्रंथ कृत्तिकाकालांतील कीं मार्गशीर्षकालांतील, असा प्रश्न आहे. या कामीं उपयुक्त असें एक वचन शतपथामध्यें अन्यत्र मिळतें. आलभनाचा काल सांगतांना ९ व्या कांडामध्यें पुढील वचन आहे—

**तद्वै फाल्गुन्यामेव। एषा ह संवत्सरस्य प्रथमा रात्रि-र्यत्फाल्गुनी पौर्णमासी योत्तरैषोत्तमा या पूर्वा मुखत एष तत्संवत्सरमारभते ॥** ( ६।२।२।१८ )

येथें फाल्गुनी पौर्णिमा ही संवत्सराची प्रथमची रात्र असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. इ. पू. २३२० मध्यें व त्यानंतर इ. पू. १४०० पर्यंत कृत्तिकांवर वसंत-संपात व माघी पौर्णिमेला वर्षारंभ होत असल्याचें आपण वर पाहिलेंच आहे. येथलि निर्देश फाल्गुनी पौर्णिमेचे वर्षारंभाचा आहे, तेव्हां हा ग्रंथ मृगशीर्ष कालांतील होय. अर्थात् कृत्तिका पूर्वेला उगवण्याचे निर्देशावरून इ. पू. ३००० वर्षांचा जो काल सूचित होतो, तोच येथें ग्राह्य होय.

शतपथाचे कालाविषयीं येथपर्यंत विवेचन केलें आहे, त्यावरून समग्र ग्रंथाचा काल विवक्षित नाहीं हें येथें सुचवून ठेवणें अवश्य आहे. याज्ञवल्क्यमुनि हे प्रस्तुत विषय असल्यामुळें त्यांनीं संपादिलेल्या **शतपथापुरतेंच येथील विवेचन** आहे. सध्यां उपलब्ध असलेली शतपथाची प्रत एका कालांतील व एकहातीं नव्हे, याविषयीं वाद नाहीं. शतपथाचीं एकंदर कांडें चौदा आहेत, त्यांपैकीं प्रथमच्या ९ कांडांत वाजसनेयी संहितेच्या १८ अध्यायांतील कर्म-कांडासंबंधीं विवेचन आहे. त्यांपैकीं पहिलीं पांच कांडें काय तीं एकहाती व परस्परसंबद्ध दिसतात. त्यामध्यें याज्ञवल्क्याचें मत निर्णायक म्हणून जेथें तेथें सांगितलें आहे. पुढील ६ ते ९ या कांडांत याज्ञवल्क्यांचें नांव नाहीं. त्यांत शांडिल्य मुनीला प्रमाण मानिलेलें आहे. अर्थात् शतपथाचा हा भाग नंतरच्या कालांतील होय. शेवटचीं पांच कांडें तर अर्वाचीन आहेत. तेव्हां शतपथाचे कालाविषयीं विवेचन करतांना आम्ही शतपथाचे पूर्वार्ध विशेषतः याज्ञवल्क्य-संपादित शतपथासंबंधानें करीत आहों, असें वाचकांनीं समजावयाचें आहे.

शतपथाचा जो काल वर दाखविला आहे तो बरोबर असल्याविषयीं महत्त्वाचें प्रमाण द्यावयाचें म्हणजे त्यांत मासांच्या नक्षत्रसंज्ञा मुळींच नाहींत, हें होय. पूर्वी मासांना नांवें ऋतुकालदर्शक-मधु, माधव वगैरे-होतीं. मृगशीर्षकालांत नाक्षत्र संज्ञांची कल्पनाच आलेली दिसत नाहीं. विशिष्ट नक्षत्रांवर प्रतिमासीं चंद्र पूर्ण होत असतो, अशी अनुभवानें कल्पना येऊन फक्त पूर्णिमांना नाक्षत्र नांवें

त्या कालीं मिळाली होती. मृगशीर्षकाल व कृत्तिकाकाल यांचे संधिकालीं पूर्णिमांचे नांवावरून मासांना नाक्षत्र संज्ञा मिळाल्या असाव्या, असें दिसतें. शतपथ हा ग्रंथ कृत्तिकाकालांतील असता तर तशा कांहीतरी संज्ञा त्यांत आल्या असत्या. शतपथाचे कांडांत वैशाख ही एकच मासाची नाक्षत्र संज्ञा आढळते व तें कांड तर अर्वाचीन आहे.

शांतिपर्वांतील याज्ञवल्क्यांच्या कथेंत ज्या जनक राजाला त्यांनीं उपदेश केल्याचें सांगितलें आहे, त्याचें नांव दैवराति असें दिलें आहे. हें नांव पैतृक आहे. अर्थात् दैवराति म्हणजे देवराताचा पुत्र. पुराणांतील वंशावलि पाहिली तर तींत देवराताचा पुत्र बृहद्रथ म्हणून सांगितला आहे. तेव्हां दैवरातीचें खरें नांव बृहद्रथ. इक्ष्वाकुवंशीयांचीं चरित्रें सांगतांना मांधात्याचे कथेंत त्यानें बृहद्रथ, आवीक्षित, मरुत्त वगैरे राजांना जिंकल्याचें वर्णन आहे. म्हणजे मांधाता व बृहद्रथ आणि त्यानिमित्त याज्ञवल्क्य समकालीन ठरतात. बृहद्रथापासून सीरध्वज जनकापर्यंत सोळा पिढ्या होतात. सीरध्वज जनक हा रामायणांतील सीतेचा पिता. अर्थात् बृहद्रथ व राम यांमध्यें अंतर १६ पिढ्यांचें आहे. पण मांधात्यापासून रामापर्यंत बेचाळीस पिढ्या होतात. दोहोंमध्यें एकवाक्यता करणें हें एक कोडेंच आहे. तथापि जनकाचे वंशावळींत कित्येक राजे सांगावयाचे राहिलेले आहेत, हें उघड दिसतें. तेव्हां सोळा ही संख्या अग्राह्य होय. सामान्यपणें पिढी वीस वर्षांची धरितों व त्या हिशोबानें बृहद्रथ व राम यामध्यें अंतर ८०४ वर्षें पडतें. तथापि त्यांत कांहीं राजे असे संभवतात कीं, त्यांची गणना पिढ्या मोजतांना मात्र करावी लागते; पण ते गादीवर बसले नसल्यामुळें त्यांची कारकीर्द मुळींच नसते. उदा० अभिमन्यु. पिढ्या मोजतांना युधिष्ठिर, अभिमन्यु व परीक्षित अशा पिढ्या आपण म्हणतों पण यांतील अभिमन्यु पूर्वींच मृत झाल्यामुळें युधिष्ठिराचे मागें परीक्षित गादीवर आला आहे. अशा अवस्था येथें संभवतात. पौरस्त्य राजवंशाचा दीर्घ काल अभ्यास करून पार्गिटरनें बारा वर्षांची पिढी धरावी, अशी कल्पना सुचविली आहे. म्हणजे येथें ४२ पिढ्यांचीं ५०४ वर्षें होतात. यांतूनहि मार्ग काढावयाचा म्हणजे येथें सरासरी ६२० वर्षांचें अंतर धरावें, हा सुरक्षित मार्ग होय. रामाचा काल आम्ही शकपूर्व सुमारें २५० वर्षें ठरविला आहे. त्यामागें

सहाशें वर्षे म्हणजे शतपथाचा जो काल वर दिला आहे, त्याहून भिन्न काल येत नाहीं.

## शंका व परिहार

बृहदारण्यक हें शतपथाचा शेवटचा भाग आहे व त्यांत याज्ञवल्क्य-जनकाचा संवाद आहे. त्यांत याज्ञवल्क्यांचा जनकाला उपदेश आहे. संवादाचे पूर्वी जनकाचे दरबारांतील पंडितांशीं याज्ञवल्क्यांचा वाद झाला असून त्यामध्यें त्या सर्वांचा पराजय झाल्याचें सांगितलें आहे. शतपथाचीं शेवटचीं कांडें अर्वाचीन असल्याचें पूर्वीं सांगितलें आहे व त्यावरून यांतील याज्ञवल्क्य-जनक-संवाद पूर्वींचे याज्ञवल्क्यांनीं संपादिलेला नव्हे, हें सांगावयाला नको. तथापि कथा-विषयक याज्ञवल्क्य प्राचीन कीं कसे? हा प्रश्न अनिर्णीत राहतो. त्याचा आतां विचार करूं.

त्या वेळच्या वादविवादांत दरबारांतील एक पंडित भुज्यु म्हणून होता. त्यानें याज्ञवल्क्यांना पारीक्षितांना कोणती गति मिळाली, असा प्रश्न विचारला आहे. आणि याज्ञवल्क्यांनीं त्याचें उत्तर म्हणून अश्वमेध करणाराला जी गति प्राप्त होते, ती गति त्यांना मिळाल्याचें सांगितलें आहे. पौरव वंशांत पारीक्षित् जनमेजय दोन असले तरी अश्वमेध करणरा त्यांतील एक व तोहि पहिला हें पूर्वीं सिद्ध केलें आहे. या राजाला ब्रह्महत्येच्या दोषास्तव राज्यत्याग करावा लागला व त्यानिमित्त त्यानें अश्वमेध केला. जनमेजय व त्याचे भाऊ मरण पावल्यावर नंतरच्या कालांत लोकांमध्यें त्यांना कोणती गति मिळाली असावी, याची जिज्ञासा संभवते. वरील प्रश्न याज्ञवल्क्यांना करण्यांत आला आहे. अर्थात् बृहदारण्यकांतील याज्ञवल्क्य पहिला जनमेजय व भारतीय युद्ध यांमधील कालांतील होय. म्हणजे शतपथाचा संपादक त्याहून वेगळा हें सांगणें नलगे.

शतपथाचे संपादनाची कथा शांतिपर्वांत आली आहे. ती प्राचीन याज्ञवल्क्या-विषयीं होय, हें येथपर्यंत सिद्ध झालें आहे. ती कथा लक्षपूर्वक वाचली असतां आणखीहि कित्येक गोष्टींचा उलगडा होतो, त्या येथें देतों. ती कथा वाचतांना येणाऱ्या शंकांचा परिहार त्या योगानें आपोआप होणार आहे. या कथेंत त्या याज्ञवल्क्यांचे गुरु कोण, हें सांगितलेलें नाहीं व गुरुशीं कलह तर मुळींच दिसत

ीं. आदित्यापासून आपणांस यजुर्वेद कसा प्राप्त झाला, हें याज्ञवल्क्यांनीं या ध्यायाचे प्रारंभीं जनकाला निरूपिलें आहे. निरूपणाचा उपक्रम—

**परं गुह्यमिमं प्रश्नं शृणुष्वाऽवहितो नृप ॥ ३२३।१**
**यथार्षेणेह विधिना चरताऽवनतेन ह ॥**
**मयादित्यादवाप्तानि यजूंषि मिथिलाधिप ॥२॥**

ा आहे. पुढें तपश्चर्या केल्यावर आदित्य प्रसन्न झाला व त्यानें याज्ञवल्क्यां-वर मागावयास सांगितलें. वराचे योगानें त्याचे शरिरांत सरस्वती प्रविष्ट रून यजुर्मंत्र प्राप्त झाले. या वेळीं त्यांचे अंगाचा दाह होऊं लागला असतां, उदकांत शिरले. तेव्हां आदित्यानें तो दाह थोडा वेळ सहन करावा, मग तो ोआप शांत होईल असें आश्वासन दिलें व त्याप्रमाणें शांतता आल्यावर—

**ततः शतपथं कृत्स्नं सरहस्यं ससंग्रहम् ।**
**चक्रे सपरिशेषं च हर्षेण परमेण ह ॥**

याप्रमाणें शतपथ-संपादल्याचें सांगितलें आहे. अश्वरूपानें मंत्रहरण केल्याची पना यांत नसून ते याज्ञवल्क्यांनीं स्वतां मनुष्यरूपानेंच ग्रहण केल्याचें त्यांत ष्ट म्हटलें आहे. वाजिनः या नांवावरून अश्वरूपाची कल्पना निर्माण झाली ावी. तित्तिरी पक्ष्यांचे रूपानें कित्येक शिष्यांनीं विद्या ग्रहण केल्यामुळें ती तरीय शाखा झाल्याची जी कथा अन्यत्र आढळते, ती याच मासल्याची होय. तविक वाजि व तित्तिर हीं त्या मुनींचीं नांवें. शुक, हंस, ऋक्ष, शंख, उलूक, अरणी अशीं पशुपक्ष्यादिकांचीं नांवें मनुष्यांना योजिलेलीं पुराणांतून मिळतात. याच नांवाविषयीं इतकें बाचकण्याचें कारण काय?

येथेंच शतपथनिर्मितीची कथा सांगितल्यावर पुढें जनकाचे यज्ञांत दक्षिणेनिमित्त ह झाल्याचें सांगितलें आहे व व्यासांचे वैशंपायनादि शिष्यचतुष्टयांचीं नांवें न त्यांशीं याज्ञवल्क्यांचा संबंध जुळविला आहे. पण हा भाग स्वभावतःच प्त दिसतो. कारण या विषयांचें निरूपण झाल्यावर लागलींच याज्ञवल्क्यांचें ीं पुढील वचन आहे—

**सूर्यस्य चानुभावेन प्रवृत्तोऽहं नराधिप ।**
**कर्तुं शतपथं चेदं अपूर्वं च कृतं मया ॥२३॥**

शतपथ संपादल्याचें पूर्वी सांगण्यांत आलें आहे व तो श्लोक वर दिला आहे; आणि येथें शतपथसंपादनाला प्रारंभ केल्याचें सांगितलें आहे. म्हणजे प्रारंभ-निरूपक हा श्लोक व तदनुषंगानें मागील श्लोक प्रक्षिप्त होत, हें उघड होत आहे. येथें २३ व्या श्लोकांत पूर्वोद्धृत श्लोकाचा केवळ अनुवाद अथवा पुनरावृत्ति केली, असें म्हणून संगति लावतां येणार नाहीं असें नाहीं. तथापि मधील श्लोकांत व्यासांच्या सुमंतुप्रभृति शिष्यांशीं कलह झाल्याचें निरूपण आहे, त्याचें प्रयोजन दिसत नाहीं. वैशंपायनाशीं कलह झाल्याची जी आख्यायिका आहे, ती येथें गोवून घेण्याचा हा प्रयत्न दिसतो.

## समारोप

याज्ञवल्क्य हें नांव अनेक ऋषींचें असल्यामुळें कोणाची कामगिरी कोणती, हा विवेक करणें फार बिकट असून त्यामुळें वाचकांचे फार घोटाळे झाले आहेत. वसिष्ठ, विश्वामित्र, जनक, यांसारखीं कित्येक नांवें समग्र कुलाविषयीं योजिलेलीं आहेत. त्यामुळे घोटाळे होत असते तरी ते एका कुलापुरते होतात व शोधकांना तरी तीं कुलनामें असें माहीत असल्यामुळे घोटाळ्याचें स्वरूप थोडें हलकें होतें. याज्ञवल्क्य हें कुलनाम नसून त्या नांवाच्या अनेक व्यक्ति झाल्या आहेत व त्या भिन्न भिन्न कालीं झाल्या आहेत. चारित्रकोशकारांनीं त्यांची सहा ही संख्या निश्चित केलीच आहे. प्रस्तुतचे विवेचनावरून त्यांत आणखी भर पडणार आहे. वाजसनेयी संहिता आणि शतपथ यांचे संपादक त्यांमध्यें फार प्राचीन होत. पहिल्या जनमेजयानंतर जनकाचे दरबारांत शाकल्याशीं ज्यांनीं वाद केला, ते दुसरे होत. ऋग्वेदाचे पदपाठाची कल्पना याच शाकल्याची असावी, असें वाटतें. भीष्मांनीं शंतनूचे मृत्यूनंतर लागलींच ज्या उग्रायुधाचा वध केला, त्याचा पिता कृती हा हिरण्यनाथ कौशल्याचा शिष्य असल्याचें सांगितलें आहे. या हिरण्यनाथ कौशल्याचे याज्ञवल्क्य म्हणून शिष्य असून त्यांनीं या गुरूपाशीं योगशास्त्राचा अभ्यास केल्याची कथा आहे. हे तिसरे याज्ञवल्क्य होत. वैशंपायनाचे शिष्य चौथे आणि स्मृतिकार पांचवे. दोहोंविषयीं प्रस्तुत आम्हाला चर्चा करावयाची नाहीं व करीत नाहीं. शतपथाचे संपादक सर्वांत प्राचीन व इतरांहून भिन्न इतकेंच आम्हांला दाखवावयाचें होतें, तेवढें येथपर्यंत दाखविलें आहे.